सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "वनमहोत्सव" (२४०६ ८५५१) लेखाशीर्षांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२३/प्र.क्र.६२/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:-३१ मार्च, २०२४

<u>वाचा</u>:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दिनांक २८.०७.२०२३

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३०.१०.२०२३

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक कक्ष-१/प्र.क्र.१९/योजना/१५९४/२०२३-२४, दिनांक ०८.११.२०२३

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक कक्ष-१/योजना/प्र.क्र.१९/१६८४/२०२३-२४, दिनांक २४.११.२०२३

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.९८/७५०/२०२३-२४, दिनांक ०१.१२.२०२३

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक कक्ष-१/योजना/प्र.क्र.१०१/१७३९/२०२३-२४, दिनांक ०५.१२.२०२३

८) शासन समक्रमांक दिनांक १८.१२.२०२३ रोजीचे पत्र.

९) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक कक्ष-१/प्र.क्र.१९/योजना/१९२९/२०२३-२४, दिनांक २८.१२.२०२३

१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.९८/८६५/२०२३-२४, दिनांक ०१.०१.२०२४

११) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०४.०१.२०२४

१२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०२३/प्र.क.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४ व दिनांक ०४.०३.२०२४

१३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.९८/११२७/२०२३-२४, दिनांक १२.०३.२०२४

<u>प्रस्तावना</u> :-

"वनमहोत्सव" योजनेसाठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन (११)(३४) वन महोत्सव (२४०६८५५१) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ करिता खालीलप्रमाणे नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे:-

| योजनेचे नाव- वनमहोत्सव | | | | |
|---|---|---|---|---|
| सन २०२३-२४ | ०२- मजूरी | २१- पुरवठा व सामुग्री | २६- जाहिरात व प्रसिध्दी | एकूण (रु.लक्ष) |
| करिता अर्थसंकल्पीय निधी | १७२८.२० | ७४०.६५ | ३१.१५ | २५००.०० |
| सुधारित अंदाज | १५५५.५० | ५१८.५० | २१.८० | २०९५.८० |

उपरोक्त तक्त्यात नमूद अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी शासन निर्णय दिनांक ३०.१०.२०२३ व दिनांक ०४.०१.२०२४ अन्वये अनुक्रमे रु.५४९.९५ लक्ष व रु.५४१.५९ लक्ष असे एकूण **रु.१०९१.५४ लक्ष** इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

०२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथे नमूद दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, वित्तिय वर्ष सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२३-२४ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्रमांक १२ येथील दिनांक ०५.०२.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधीत वितरीत करण्याकरीता मर्यादा निश्चित करण्यात आलेल्या आहेत.

०३. प्रधान मुख्य वनसरंक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १३ येथील दिनांक १२.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये “वनमहोत्सव” २४०६८५५१ या योजनेंतर्गत नागपूर व नाशिक वनवृत्तामधील अनावधानाने प्रस्तावामध्ये समाविष्ट करावयाचे राहून गेलेल्या ११.९८ लक्ष रोपांच्या बांधील कामांबाबत निधी वितरीत करण्याची विनंती शासनास केली आहे. सदर विनंतीनुसार “वनमहोत्सव” २४०६ ८५५१ या योजनेंतर्गत नागपूर व नाशिक वन वृत्तामधील ११.९८ लक्ष रोपांच्या बांधील कामांकरीता रु.१०७.०५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या “वनमहोत्सव” २४०६ ८५५१ या योजनेकरिता सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात नागपूर व नाशिक वन वृत्तामधील ११.९८ लक्ष रोपांचे संगोपन व देखभाल यासाठी ०२-मजूरी या सविस्तर शिर्षांतर्गत रु.७४.९३ लक्ष व २१ -पुरवठा व सामुग्री या सविस्तर शिर्षांतर्गत रु.३२.१२ लक्ष असे एकूण रू.१०७.०५ लक्ष इतका निधी खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार वन वृत्तनिहाय वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वृत्ताचे नाव | बाब | वितरीत करावयाचा निधी (रु. लाखात) | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | सविस्तर उद्दिष्ट | | |
| | | | ०२- मजुरी | २१-पुरवठा व सामुग्री | एकूण |
| १ | नागपूर | ७.५५ लक्ष लहान रोपे देखभाल व संगोपन तसेच ०.५० लक्ष उंच रोपे देखभाल | ३५.९६ | १५.४१ | **५१.३७** |
| २ | नाशिक | ३.९३ लक्ष उंच रोपे देखभाल | ३८.९८ | १६.७० | **५५.६८** |
| | | **एकूण** | **७४.९४** | **३२.११** | **१०७.०५** |

उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार नागपूर व नाशिक वन वृत्ताकरीता एकूण रु.१०७.०५ लक्ष इतका निधी विरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त तक्त्यात नमूद एकूण रु.१०७.०५ लक्ष इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार, विहीत अटी व शर्तीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. तसेच उपरोक्त तक्त्यात नमूद वितरीत करण्यात येत असलेला निधी हा सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात नाशिक व नागपूर वन वृत्तामधील लहान रोपांचे संगोपन व देखभाल तसेच उंच रोपांचे संगोपन या कामांकरीताच

खर्च करण्यात यावा. अन्य नवीन कामांकरीता खर्च करण्यात येणार नाही याबाबत संबंधितांना निदेश देण्यात यावेत.

०३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर हे वर्ष २०२३-२४ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. तसेच सदर निधी खर्च करतांना संबंधित कामांकरीता संबंधित सक्षम प्राधिकारी यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केल्याची खात्री करूनच निधी वितरीत करावा. याबाबतची संपूर्ण जबाबदारी ही प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाची राहील.

०४. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व १२ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०६. वृत्त व जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०७. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,**
**राज्य योजनेंतर्गत योजना (११)(३४) वनमहोत्सव योजनंतर्गत (राज्य) (२४०६ ८५५१).**
**०२- मजूरी , २१- पुरवठा व सामुग्री**

०८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक १२.०४.२०२३, दिनांक ०५.०२.२०२४ व दिनांक ०४.०३.२०२४ रोजीची परिपत्रके तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.

विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३३११४३६३००८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2024.03.31 14:47:03 +05'30'

**( वि.बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य ,नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर/नाशिक
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.
७. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
८. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, ब-१ व फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती फ-११